**महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी (महानिर्मिती)च्या भुसावळ औष्णिक वीज केंद्र विस्तारीकरण योजनेमध्ये भांडवली गुंतवणूक .सन २०१६-१७**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधिवी-२०१७/प्र.क्र.४४(१)/ऊर्जा-३**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दि.३१ मार्च २०१७

संदर्भ - १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६; दि. २३ ऑगस्ट, २०१६ ; दि. ४ जानेवारी, २०१७ व दि.०८ फेब्रुवारी २०१७.
२. शासन निर्णय क्र.निधिवी-२०१७/प्र.क्र.४१/ऊर्जा-३, दि३१ मार्च, २०१७.
३. महानिर्मिती कंपनीचे पत्र क्र. MD/MSPGCL/GOM/No.०२४०८, दि. ८ मार्च, २०१७.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी (महानिर्मिती)च्या भुसावळ औष्णिक वीज केंद्र विस्तारीकरण योजनेमध्ये २०% इतकी रक्कम भांडवली गुंतवणूकीच्या स्वरुपात राज्य शासनाने महानिर्मिती कंपनीस उपलब्ध करुन द्यावयाची आहे. सदर रक्कम उपलब्ध करुन देण्यासाठी सन २०१६-१७ या वर्षामध्ये रु.४२.९९ कोटी इतका निधी मंजूर करण्यात आला आहे. प्रकल्प पुर्णत्वास नेण्यासाठी रु. ४२,९९,४०,०००/- ची आवश्यकता असल्यामुळे उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये रु.४०,०००/- पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन घेण्यात आले आहेत. अशा प्रकारे या योजनेअंतर्गत एकूण रु.४२,९९,४०,०००/- इतकी रक्कम उपलब्ध करुन घेण्यात आली असून सदर रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, मुंबई यांना समायोजनाद्वारे वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

भुसावळ औष्णिक वीज केंद्र विस्तारीकरण योजनेमध्ये राज्य शासनाची भांडवली गुंतवणूक म्हणून रु.४२,९९,४०,०००/- (रुपये बेचाळीस कोटी नव्याण्णव लाख चाळीस हजार फक्त) इतकी रक्कम पुस्तकी समायोजना द्वारे वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबीचा खर्च “मागणी क्र. के-११, ४८०१ वीज प्रकल्पावरील इतर भांडवली खर्च, ०२ औष्णिक विद्युत निर्मिती, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ८०० इतर खर्च (०१) राज्य योजनांतर्गत योजना, (०१)(०५) भुसावळ औष्णिक वीज केंद्र विस्तारीकरण योजनेमध्ये भांडवली गुंतवणूक (४८०१३५३५) ५४ गुंतवणूक” या लेखाशीर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन समायोजीत करण्यात यावा.

४. वरील मंजूर झालेल्या भाग भांडवलाची संपूर्ण रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादीत यांना रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महानिर्मिती कंपनीकडून शासनास येणे असलेल्या रकमेपोटी वसूल करण्यात यावी आणि खाली नमूद केलेल्या जमा लेखाशिर्षाखाली समायोजनाद्वारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशीर्ष |
|---|---|---|---|
| १. | वित्तीय वर्ष सन २०१६-१७ या वर्षातील भाडेपट्टी पोटी समायोजीत करावयाची रक्कम | रु.४२,९९,४०,०००/- | ०८०१ वीज (२२)इतर जमा रकमा, (२२)(०१) इतर जमा रकमा - महाराष्ट्र राज्य वीज मंडळाकडून मिळणारी भाडेपट्टीची रक्कम) |
| | एकूण | रु.४२,९९,४०,०००/- | |

५. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्य अखत्यारित व अधिकारात रु.४२,९९,४०,०००/- (रुपये बेचाळीस कोटी नव्याण्णव लाख चाळीस हजार फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.११८/२०१७ व्यय-१६, दिनांक ३१ मार्च, २०१७ मधील मंजूरीस अनुसरुन निर्गमीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०३३१२१११३८४३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.01 01:01:13 +05'30'

**(वि.म. राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रति -**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०
२. महा लेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
३ निवासी लेखाअधिकारी मुंबई
४ व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड वांद्रे(पूर्व) मुंबई -५१
५ अधिदान व लेखा अधिकारी, , (अराप / रालेवि-१), अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

६ अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
७ नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय मुंबई ४०००३२
८ अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९ क.अ.(प्रशासन-१), उद्योग उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई-३२
१०. वित्त विभाग, /(अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती /साऊ / व्य-१६) मंत्रालय, मुंबई, ३२.
११ निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.